**नाशिक तालुक्यातील नानेगांव काळवस्ती नाशिक साखर कारखाना ते बंगाली बाबा दर्गा येथे राष्ट्रीय महामार्ग क्रमांक ५० ला जोडणारा रस्ता या अवर्गीकृत रस्त्याचा प्रमुख जिल्हा मार्ग ३७ मध्ये समावेश करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**सार्वजनिक बांधकाम विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः रवियो-२०१८/प्र.क्र.१२५/नियोजन-२**

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२

दिनांक- ३१ जुलै, २०१८.

**<u>पहावे</u>** :-१) मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, नाशिक यांचे पत्र क्र.जा.क्र./ साबांप्राविना/ प्रआ/ दर्जोन्नत/ ता.नाशिक/ ३१८२/ २०१८. दि.२५/०६/२०१८.

**प्रस्तावना :-**

मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, नाशिक यांचेकडून संदर्भाधीन पत्रान्वये नाशिक तालुक्यातील प्रमुख जिल्हा मार्ग ३७ मध्ये नानेगांव काळवस्ती नाशिक साखर कारखाना ते बंगाली बाबा दर्गा येथे राष्ट्रीय महामार्ग क्रमांक ५० ला जोडणारा या अवर्गीकृत रस्त्याचा समावेश करणेबाबत प्रस्ताव शासनास प्राप्त झाला आहे.

सदर ४.६०० कि.मी. लांबीचा रस्ता नाशिक सहकारी साखर कारखाना लि., पळसे यांच्या मालकीचा असून सदर रस्त्याचा मालकी हक्क विना मोबदला सार्वजनिक बांधकाम विभागास देण्यास नाशिक सहकारी साखर कारखाना लि., पळसे यांच्या प्राधिकृत मंडळाने मंजुरी दिलेली आहे. सदर प्रस्तावित रस्त्याची लांबी प्रमुख जिल्हा मार्ग-३७ मध्ये समावेश केल्यास भविष्यात सदरचा रस्ता हा नाशिक साखर कारखाना व परिसरातील शेतकरी व गावांसाठी दळणवळणाच्या दृष्टीने सोयीचा होणार आहे. तसेच राष्ट्रीय महामार्ग क्रमांक ५० ला जोडणारा मार्ग म्हणून तालुक्याच्या सर्वांगीण विकासासाठी महत्त्वाचा आहे. त्यामुळे उपरोक्त रस्ता दर्जोन्नत करून प्रमुख जिल्हा मार्ग- ३७ मध्ये समाविष्ट करण्याचे शासनाच्या विचाराधीन होते.

**शासन निर्णय :-**

मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, नाशिक यांचा प्रस्ताव विचारात घेऊन नाशिक तालुक्यातील नानेगांव - काळवस्ती - नाशिक सहकारी साखर कारखाना लि. पळसे ते बंगाली बाबा दर्गा येथे राष्ट्रीय महामार्ग क्रमांक ५० ला जोडणारा रस्ता या ४.६०० कि.मी. अवर्गीकृत रस्त्याचा प्रमुख जिल्हा मार्ग ३७ मध्ये समावेश करण्यात येत आहे. सदर रस्त्याच्या भुसंपादनाकरीता नाशिक सहकारी साखर कारखाना लि., पळसे यांना कोणताही मोबदला मिळणार नाही. या अटीच्या अधिन राहुन सदर रस्त्याचा प्रमुख जिल्हा मार्ग ३७ मध्ये समावेश करण्यात येत आहे.

परिणामी, रस्ते विकास योजना २००१-२१ मधील नाशिक जिल्ह्याच्या **प्रमुख जिल्हा मार्ग** लांबीत **४.६०० कि.मी.** ने वाढ होवून एकूण लांबी (२६०२.४३+४.६०० ) म्हणजेच **२६०७.०३ कि.मी.** इतकी होईल.

हा शासन निर्णय, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यांत आलेला असून त्याचा सांकेतांक क्रमांक २०१८०७३११६४८४३२५१८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Prashant Vinayakrao Patil

Digitally signed by Prashant Vinayakrao Patil
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Works Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=2b1bad66664b1e11e3bf66db1d526143e814db5f8c505422af66a5628314537e, cn=Prashant Vinayakrao Patil
Date: 2018.07.31 16:49:21 +05'30'

**( प्रशांत पाटील )**

अवर सचिव (नियोजन), महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) विभागीय आयुक्त, नाशिक.

२) मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, नाशिक (यांनी सदर शासन निर्णयानुसार रस्ते विकास योजना २००१-२०२१ च्या रस्ते सूचीमध्ये नोंद घ्यावी व नकाशामध्ये बदल करुन जिल्ह्याच्या संकेतस्थळी प्रसिध्द करावा. तसेच केलेल्या कार्यवाहीचा अहवाल शासनास सादर करावा)

३) जिल्हाधिकारी, नाशिक.

४) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, नाशिक.

५) अधिक्षक अभियंता,सा.बां.मंडळ,नाशिक (यांनी सदर शासन निर्णयानुसार रस्ते विकास योजना २००१-२०२१ च्या रस्ते सूचीमध्ये नोंद घ्यावी व नकाशामध्ये बदल करुन जिल्ह्याच्या संकेतस्थळी प्रसिध्द करावा. तसेच केलेल्या कार्यवाहीचा अहवाल शासनास सादर करावा.)

६) कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, नाशिक.

७) संचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई.

८) रस्ते विकास योजना २००१-२०२१ ची नस्ती.

९) निवडनस्ती.